संत सेवालाल महाराज बंजारा / लमाण तांडा समृध्दी योजनेमध्ये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार यांच्या अध्यक्षतेखालील समितीमध्ये-२-अशासकीय सदस्यांची नियुक्ती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः तांसुयो-२०२४/प्र.क्र.२९(५)/आस्था-५**

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट
मुंबई-४०० ००१.
दिनांक: ०९ ऑगस्ट, २०२४.

**वाचा :-**

शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास विभाग, क्रमांक-तांडा सुधार-२०१९/प्र.क्र.६७/आस्था-५, दिनांक २३ फेब्रुवारी, २०२४.

**प्रस्तावना :-**

ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्र.तांडा सुधार-२०१९/प्र.क्र.६७/आस्था-५, दि.२३.०२.२०२४ अन्वये संत सेवालाल महाराज बंजारा / लमाण तांडा समृध्दी योजनेंतर्गत करावयाच्या कामाचा ग्राम पंचायतीकडून प्राप्त झालेल्या प्राधान्यक्रम व निकड लक्षात घेऊन कामाची निवड करण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली असून सदरहू समितीमध्ये बंजारा / लमाण समाजाचे २ प्रतिनिधी-अशासकीय सदस्य म्हणून नियुक्ती करण्याची तरतूद आहे. परंतू बहुतांश जिल्हा परिषदांमध्ये प्रशासक कार्यरत असल्याने सदर अशासकीय सदस्यांची नेमणूक शासन स्तरावरुन करणे आवश्यक असल्याचे दिसून आले. ही बाब विचारात घेऊन मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार यांच्या अध्यक्षतेखालील समितीत अशासकीय सदस्यांची ३ वर्षाकरिता नेमणूक शासन स्तरावरुन करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

**संत सेवालाल महाराज बंजारा / लमाण तांडा समृध्दी योजनें**तर्गत ग्राम पंचायतीकडून प्राप्त झालेल्या कामाचा प्राधान्यक्रम व निकड लक्षात घेऊन कामाची निवड करण्यासाठी **मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार** यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हा स्तरीय समितीमध्ये अशासकीय सदस्य म्हणून ३ वर्षाकरिता बंजारा /लमाण समाजाचे **२ प्रतिनिधी** खालील प्रमाणे नियुक्त करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अशासकीय सदस्यांचे नांव | सदस्याचा पत्ता | संपर्क क्रमांक |
|---|---|---|---|
| १ | **श्री. रणजीत शोभा चव्हाण** | मुक्काम कानडी,ता. शहादा, जि. नंदुरबार | ८८८८६२६६३६ |
| २ | **श्री. शिवाजी तोळाराम चव्हाण** | मु. मदाने ता. शहादा, जि. नंदुरबार | ९५४५७३११९९ |

२. सदर अशासकीय सदस्यांना बैठकीच्या दिवशी द्यावयाच्या दैनिक भत्ता व प्रवास भत्ता सदर योजनेच्या प्रशासकीय खर्चासाठी अनुज्ञेय असलेल्या २ % टक्के निधीमधून अदा करण्यात येणार असल्याने संबंधित अशासकीय सदस्यांनी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार यांच्याकडे सादर करावीत व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार यांनी संबंधित अशासकीय सदस्यांना शासन नियमानुसार दैनिक भत्ता अदा करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०९१६२७०७३६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PANDIT KHANDERAO JADHAV

Digitally signed by PANDIT KHANDERAO JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=130c3faa5ebf138c8b39058785ac534c17d9b377a1b84b0b4d591d63ea56da06, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F5C40942371A6969108D4D7E802129EA5F7A19F482726930E17FE1F06AD5CC76, cn=PANDIT KHANDERAO JADHAV
Date: 2024.08.09 18:14:11 +05'30'

**पंडीत जाधव**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३) मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
४) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
६) मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
८) मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
९) मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई.
१०) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता,१/२ , महाराष्ट्र, मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर.
११) मा.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग (सर्व).
१२) विभागीय आयुक्त, नाशिक.
१३) जिल्हाधिकारी, नंदुरबार.
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,नंदुरबार.
१५) श्री. रणजीत शोभा चव्हाण, मुक्काम कानडी,ता. शहादा, जि. नंदुरबार.
१६) श्री. शिवाजी तोळाराम चव्हाण, मु. मदाने ता. शहादा, जि. नंदुरबार.
१७) संचालक, अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
१८) संचालक, निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१९) सर्व सह सचिव /उप सचिव, ग्राम विकास विभाग,मुंबई.
२०) उपायुक्त (विकास),विभागीय आयुक्त कार्यालय, नाशिक.
२१) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,नंदुरबार.
२२) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२३) गट विकास अधिकारी, पंचायत समिती (जिल्हा परिषद नंदुरबार अंतर्गत सर्व).
२४) निवड नस्ती ( आस्था-५ ), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.